ई - साहित्य प्रकाशन

नेटाक्षरी

०२.०२.२००९
अंक : ११



# हायकू पहावं करुन

## हायकु विशेषांक

### संपादक मंडळ

**यजमान संपादक -**

- सोनाली घाटपांडे ( पुणे )

**अतिथी संपादक -**

- ऋचा घाणेकर ( पुणे )

**सहसंपादक -**

- स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
- रेणूका रेपाळ (अमेरिका )
- सुरुचि नाईक ( नागपूर )
- आनंद माने ( सोलापूर )
- नाम गुम जायेगा ( ठाणे )

### ह्या अंकात वाचा....

- हिरवेगार रसरशीत हायकू
- फुलपाखरु आपल्याच नादात
- संपादकीय



“ नेटाक्षरी ” हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com



# हायकू - शिरीष पै

वाऱ्यावर डुलणारं रानफुल
किती किती हसलं
कुणालाचं नाही दिसलं

वाऱ्यावर डुलणारं रानफुल
किती किती हसलं
कुणालाचं नाही दिसलं

भगव्या कोरांटीला विचारलं
कस गं तुझ रूप रंगात न्हालं
म्हणाली वेडे तुला नाही कळलं

इतक्या वेगान गाडी गेली
रस्त्यान उमललेली रानफुल
डोळेभरून पाहताही नाही आली

प्रत्येक फांदीवर तरारलीय
तांबूस कोवळी पालवी
माझी रोजची वाटच झालीय नवी

कोण पाखरू गातय बागेत
वेगान धावत गेले
तर गाण्यासकट उडून गेले

पिवळधमक फुलपाखरू
उन्हामध्ये हरवल
सावलीवरून ओळखलं

<u>अनुवाद</u>

पावसानं खाली लवलेली
ही बार्लीची रोप पिकलेली
माझी पायवाट करतात चिंचोळी
जोशो

माझे शेजारी कुठे गेले
ह्या हिवाळ्यातल्या सायंकाळी
इतके कशाने गप्प झाले
बाशो

सूर्य मावळताना
बुजगावण्याची सावली
रस्त्यावर सरकली
शोहा

पहाटेच्या वेळी कोकीळेचे
कुणाशी हे बोलत रहाणे
कूहूकूहूतून प्रश्न विचारणे

उदासलेल माझ मन
इंतक प्रसन्न कस झालं ?
साधं पाखरू तर बागेत चिवचिवलं

# हायकू - डॉ.मधुसुदन घाणेकर

समुद्राकाठी
झाडांची रांग
लाटा घेण्यासाठी

खंडीलाची वात
जळती जळती
कव्हा रात जायची ?

पक्षी नभात
काळ्या ढ्गात
पाऊस शोधत

डहाळी
हळूवार हलली
चिमणी भरारली

घरट्यात डोकावले
कोवळे ऊन
पक्षी निद्रीस्त अजून

झाडाखाली
नुसता पाचोळा
नशिबाचा चोळामोळा

काळ्या डोहात
एकटे
सुगरणीचे घरटे

बघता बघता
तांबाटी पिकली
शेताला लाली आली

श्यतात बुजगावणं
बुजगावण्यावरच खात्यात
पाखर दाणं

जिकड तिकडं
वरड्त्यात रातकीड
अंधाराला उत



# हायकू - महेश घाटपांडे

(‘क्षण क्षण वेचताना’ हायकू संग्रहातून )



आज नक्की येणार आहे
एक हलकीशी श्रावणसर
तुझ्या येण्याची खबर

पाण्यावर डोलणारी
एक चिमुकली होडी
तिला सागराची गोडी

तुझ दुःख हलक करण्यासाठी
मागतोय तुझी साथ
ही अजबच बात

निरोप घेताना वसंत
मुक्यानेच रडला
तेव्हाच स्वातीचा थेंब पडला

म्हणालीस, मधूनच येते तुला
बरसण-या श्रावणाची सय
अगं हेच, वयात यायच वय

एक फुलपाखरू अचानक
माझ्या तळव्यावर येऊन बसल
ओळख असल्यागत हसलं

आकाशाला मनातून एकदा
दुःख गेल वाटून
तेव्हाच, ढग आले दाटून

एका निष्पर्ण झाडाखाली
मी बसलोय बासरी आळवत
अगदी शेजा-यालाही नकळत

समुद्रकिनारी माझ्या पावलांवर
तू उमटवलेल्या पाऊलखुणा
हा प्रकारच जीवघेणा

तुझ्या गज-यातली फुल गळून
माझ्या तळव्यावर पसरली
आणि अवघी गात्र मोहरली

मनातल्या पिंपळपानाच
जरि वय झालय फार
तरी अजूनही हिरवगार

समोरच्या झाडावरचा पक्षी
झोके घेतोय आनंदात
आपल्याच नादात गात



# हायकू - डॉ.निरुपमा कुलकर्णी

('हायकू शतम' हायकू संग्रहातून )

सहजच बसलेली चिमणी
फांदीवरुन उडाली
हळव्या झाडाने रोज वाट पाहिली

अमावस्येची रात्र
हळूहळू उजळते
नववधू लांब जांभई देते

३.पाण्यातली मासोळी
किनारा पाहायला आली
परत पाण्यातच शिरली

सूर्यास्ताचं सौंदर्य पाहून
कालचा सूर्योदय थक्क झाला
उगवायचं विसरुन गेला

वाऱ्याच्या चापटीने
मोगरी गोड लाजली
रोजची वाट नवीन वाटली

चेरीचा लाल बहर
खुणवतोय,पण
करवंदाच्या जाळीनं जखडलाय

एक सुंदर पाखरु पाहून
मन मागे धावलं
आकाशात केवढं उंच गेलं

पिकलं पान गळतांना
फांदीवरच हसलं
झाडाला केविलवाणं वाटलं

उमलेलं फूल
माळ्यानं तोडलं
कळीनं सारं सावधपणे पाहिलं

काटेरी वाटेवर
सुंदर परी भेटली
तरी पाठीशी सावलीच राहिली

मिश्किल भुंगा
उडून उडून दमला
कमळाच्या कुशीत झोपला

नाजूक वेल
कावळयांचा थवा
वेलीचा जीव कासावीस झाला

पिकलेलं जांभूळ
टपकन खाली पडलंय
रस गळून मलूल झालंय

चित्रातलं फुलपाखरु पाहून
बागडणारी चिमणी
चित्रकारावर चिडली

दिवसरात्र कुशीत घेतलेल्या
कळीचं फुल कधी झालं
वेलीलासुध्दा नाही कळलं

गळलेल्या चाफ्याच्या फुलाने
परत फांदीवर रुबाबात जावे
असेच मला वाटत राहिले

गाडितलं वेगानं धावणारं
रानकळीचं सौंदर्य पाहून
मन मागेच रेंगाळलं

श्रावणातली चिमणी
नेहमीसारखीच भिजली
झाडाची फांदी तीसुध्दा फुलली

उगवता सूर्य
ढगांनी झाकला
वासराने हंबरडा फोडला

कोळ्यांनी विणली
सुरेख जाळी
माणसाची बुध्दी शरमिंदी झाली

# हायकू - स्वप्ना कोल्हे



काल मी चंद्राला उशाशी घेतला
दारी चांदण्या डोकावल्या
जळून खाक झाल्या

अळवाच्या पानावरुन
थेंब ओघळला
ठोकाच चुकला

दारी गुलमोहर
बहर ओसरला
घास अडकला

समुद्रकिनारी आज
भलतेच घडले
शिंपल्यात मी कैद झाले

पाखराची शीळ घुमते
ओल्या रानातून
तरंग उठतो मनाच्या डोहातून

नको ऐकूस
पिंपळाची सळसळ
रातभर होईल तळमळ

सूर्य किरण
चाखून पाहिले
ओठच भाजले

चैत्रातल्या सकाळी
मोगरा लालेलाल झाला
ऐकून गुलमोहराची भूपाळी

शेतात कणीस डुललं
डोळ्यात टोळधाड आली
मन भीतीनं झुललं

रानी पळस पेटलेला
आज भेटीचा दिवस
माझा श्वास जळलेला

# अतिथी संपादकाची ओळख



या अंकाची आतिथी संपादक ऋचा घाणेकर एका जाहीरात कंपनीत कॉपिरायटर म्हणून काम करते. शिवाय सुत्रसंचालन, निवेदन, एकपात्री कार्यक्रम आणि किर्तनसुध्दा करते. एम ए संस्कृत झालेल्या ऋचाची शब्दांशी आणि कवितांशी मैत्री झाली ती सात वर्षांपूर्वी. या काळात एक चारोळी संग्रह, एक हायकू संग्रह तिच्या नावावर जमा झाले. स्वरचित आणि मान्यवराच्या कवितांचे सादरीकरण ही सातत्याने करत असतेच.

या कार्यक्रमांच्या सादरीकरणाबरोबरच संहिता लेखन, निवेदन, दिग्द्‌र्शन, अशा विविध जबाबदा-याही ती समर्थपणे पेलते. “सृजनरंग” या व्यासपीठाची ती संस्थापक, याशिवाय अनेक संस्थांमधूनही ती कार्यरत आहे. “सृजनरंग” ह्या माध्यमातून स्वरचित कवितांसोबत अभिनव बंदिशींचा प्रयोग “लहरी मनाच्या लहरी ” तिच्या संकल्पनेने रंगमंचावर साकारला.

याशिवाय अनुवादित कविता, दिवाळी अंकातील कविता, गीतलेखन यामधेही तिचा सहभाग असतो . विशेष कौतुकाची गोष्ट म्हणजे शिरिष पैं यांनी स्वतःच्या पुस्तकात ऋचाच्या नावाचा उल्लेख हायकूकार म्हणून केला आहे. ऋचाच्या फुलपाखऊ आपल्याच नादात या हायकूसंग्रहाला काव्यशिल्प पुरस्कार प्राप्त झाला आहे. तसेच इंदूरचे हायकूकार शाम खरे यांनी तिच्या हायकूंचा अनुवाद केला आहे तिला बालाकवितांसाठी ही पुरस्कार प्राप्त झाले आहेत. अशा या हरहुन्नरी कवयित्रीला मनपूर्वक शुभेच्छा ! ! !

## फुलपाखरू आपल्याच नादात



फूल नसतानाही
फुलपाखरू आल
कसं रस्ता चुकलं

पकडायला फुलपाखराला
सरसावला त्याने हात
फुलपाखरू आपल्याच नादात

इवलस फुलपाखरू
कितीवेळ उड्‌तय
फुलाला शोधतय

पहातच रहावे
फुलपाखराचे नाजूक अंग
पंखावरला सुंदर रंग

करतय तरी काय
फुलपाखरु लपून
फुलामागे दडून

गोजिर फुलपाखरु
कितीवेळ उडेल
आकाशात कस झेपावेल ?

# अतिथी संपादकाच्या लेखणीतून..

हायकू ही मूळची जपानी कविता तिन ओळींची, याचे इंग्रजी अनुवाद वाचून त्याने प्रभवित होऊन शिरिष पै या'नी हायकू सर्वप्रथम मराठीत आणली . मराठी साहित्यासाठी हे बहुमोल योगदान आहे .

निसर्ग हा घटनेशी संबधित असतो. निसर्गात अशी काहीतरी घटना हायकूकार बघतो की ती पाहताच तो आतून स्तब्ध होतो ,जणू समाधीत जातो त्या नाट्यपूर्ण घटनेचे वर्णन मोजक्या शब्दात तो फक्त शब्दांकन करतो . त्याली पूर्वार्ध आणि उत्तरार्धही असतो. पूर्वार्धात केलेल्या विधानाला उत्तरार्धात कलाटणी मिळते.

## जपानी हायकूचे नियम -

हायकू ३ ओळीचा असावा . ५ - ७ - ५ अशी अक्षरांची रचना असावी . पहिल्या आणि तिसऱ्या किंवा दुसऱ्या आणि तिसऱ्या ओळीत यमक साधावे .

मराटी भाषेत हायकूने बऱ्याच प्रमाणात स्वातंत्र्य घेतले. या सर्व नियमांना पहिला छेद दिला तो स्वतः शिरीष पै यांनीच. इंग्रजी अनूवाद्कारांनी अनुवाद करताना भाषेचे सौंदर्य बिघड्णार नाही याची काळजी घेतली. त्याच मार्गाचा अवलंब करून शिरीष पै यांनी मराठीचे रचनासौंदर्य प्रथम लक्षात घेतले. त्यानुसारच अनुवाद व स्वतंत्र रचना केली. निसर्ग घटना व यमक हे नियम मात्र त्यांनी पाळले आहेत.

श्याम खरे या मध्यप्रदेशातील हायकूकारांनी ५ — ७- ५ चा नियम कसोशिने पाळला आहे. मात्र निसर्ग घटना व यमक याला पूर्ण काट देऊन सामजिक हायकू त्यांनी लिहिले आहेत. कॅक्ट्सची फुले या त्यांच्या संग्रहाला शिरीष पै यांचीच प्रस्तावना लाभली आहे. अक्षरांचे बंधन पाळून उद्‍गारात्मक स्वरूप राखल्याबद्दल त्या त्यांचे अभिनंदन करतात पण हे हायकू विशुध्द नव्हेत, असेही सांगतात.

उदा.

पायाची शिळा<br>
मंदिराचा कळस<br>
बघत नाही

डॉ. मधुसुदन घाणेकर (माझे बाबा)यांनी प्रेम विषयक आणि ग्रामीण हायकू असे प्रयोग केले. त्यांचे 'रावे भरारले' व 'तांभाटी' असे दोन संग्रह प्रकाशित झाले आहेत.

याखेरीज शांता शेळके यांसह अनेक हायकूकार मराठी साहित्याला लाभले आहेत. शिरीष पै च्या हायकू संग्रहाने प्रभवित होऊन मी देखील हायकूकडे वळले आणि बाबांच्या प्रोत्साहनामुळे 'फुलपाखरू आपल्याच नादात' हा माझा स्वरचित हायकूसंग्रह प्रकाशित झाला.

काल संध्याकाळी<br>
पावसाची सर आलेली<br>
जमिन अजूनही भिजलेली

वेलीवरचं पान<br>
पावसाचा थेंब<br>
झेलत छान

ऐकू आली अंगणातली<br>
गारांची गाणी<br>
उचलेपर्यंत झालं पाणी

हातातली छत्री<br>
छप्पर झाली<br>
पावसाच्या रात्री

आत आणि बाहेर<br>
वादळ सुटल चौफेर<br>
दिसत काहीच नाहीये

समुद्रावर संध्याकाळी<br>
पाऊस कोसळला<br>
समुद्रात कुठे हरवला

## संपादकीय —

हायकू हा नावाप्रमाणेच चिमुकला (जपानमध्ये जन्मला म्हणूनही असेल कदाचित)पण अर्थपूर्ण काव्यप्रकार.साधारणपणे हायकूचा विषय निसर्ग असतो.विशेषतः साध्याशाच गोष्टीतून नव्याने जाणवलेले काहीतरी नैसर्गिक चमत्कार पाहिल्यावर कवीमनात उमटणारे भाव,मनाचे जोडले गेलेले नाते,एखाद्या वेगळ्याच कोनातून टिपलेला निसर्ग.

जपानीत हायकू रचतांना 'किगो' नावाच्या खास हायकूसाठी वापरल्या जाणाऱ्या शब्दांचा वापर करणे आवश्यक असते.उदा.मराठीत हायकू करतांना मला ऐवजी मजला,झाड ऐवजी तरु असे शब्द.म्हणजे खास कवितेसाठी राखून ठेवलेले शब्द.

हायकूचा मूळ उच्चार आहे 'होक्कू'म्हणजे 'starting verse'.हायकू हा एका क्षणातल्या भावनेचा अविष्कार.तसं म्हणाल तर हायकू मुळचा जपानी काव्य-प्रकार.५ - ७ - ५ अशा विभागलेल्या हायकूला १७ अक्षरांची छोटी कविताही म्हणता येईल. जपानी हायकू एका सरळ ओळीत लिहिले जातात. मराठी भाषेत हायकूचा प्रचार व प्रसार शिरीष पै यांनी केला. रविंद्रनाथ टागोर यांनीही काही जपानी हायकूंचे बंगाली भाषेत भाषांतर केले आहे. गुजराती भाषेत हायकू नेण्याचे श्रेय झिनतभाई देसाई यांच्याकडे जाते.तसेच आसामी भाषेत निलमणी फुकान, कन्नड भाषेत व्ही ललिथांबा,पंजाबी भाषेत अमृता प्रीतम, हिंदीमध्ये अग्येय व सत्यभूषण वर्मा यांनी जपानी हायकूचे भाषांतर केले आहे.श्रीकांत वर्मा, कृष्णकांत दुबे यानी जपानी हायकू इंग्रजीमध्ये भाषांतरीत केले.

अशा तऱ्हेने,हायकू प्रवाह विविध भाषांत प्रवाहित होत मन मानसी फुलवित आहे.म्हणूनच,हायकू विशेषांक आपल्या हाती देतांना आम्हाला अतिशय आनंद होत आहे.

सोनाली घाटपांडे<br>
( यजमान संपादक )



" नेटाक्षरी " हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..<br>
netaksharee@gmail.com